**शासकीय अधिकारी व कर्मचारी यांच्यासाठी विहित केलेल्या परीक्षांसाठी नियुक्त केलेली सर्व एतदर्थ मंडळे बरखास्त करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: मभाप-२०२१/प्र.क्र.१०९/भाषा-२**
नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २१.०७.२०२३

**<u>वाचा:</u>** १. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. टीआरजी -१४६२ - M, दि. १४.०२.१९६३

२. मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र. हिंभाप-२०२१/प्र.क्र.११०/भाषा-२, दि. ०९.०९.२०२१

३. मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र. मटंप-२०२१/प्र.क्र.११३/भाषा-२, दि. २०.०९.२०२१

४. शासन निर्णय समक्रमांक दि. २९.०९.२०२१

**शासन निर्णय :**

एतदर्थ मंडळांसंदर्भातील यापूर्वी निर्गमित करण्यात आलेले सर्व शासन निर्णय या शासन निर्णयान्वये अधिक्रमित करण्यात येत असून त्याद्वारे निर्माण करण्यात आलेली मराठी, हिंदी आणि मराठी टंकलेखन व लघुलेखन परीक्षांसाठी निर्माण करण्यात आलेली सर्व एतदर्थ मंडळे आणि या मंडळावर नियुक्त करण्यात आलेले अध्यक्ष, शासकीय व अशासकीय सदस्य यांच्या नेमणुका रद्द करण्यात येत आहेत.

२. एतदर्थ मंडळांकडून घेण्यात येत असलेल्या परीक्षा यापुढे पुढील नावाने संबोधण्यात येतील.

१. भाषा संचालनालयामार्फत घेण्यात येणारी मराठी भाषा परीक्षा

२. भाषा संचालनालयामार्फत घेण्यात येणारी हिंदी भाषा परीक्षा

३. भाषा संचालनालयामार्फत घेण्यात येणारी मराठी लघुलेखन /मराठी टंकलेखन परीक्षा

३. उक्त नमूद सर्व परीक्षांच्या आयोजनासंदर्भात "भाषा संचालक" हे नियंत्रक म्हणून कर्तव्ये व जबाबदाऱ्या पार पाडतील. सर्व परीक्षांचे वेळापत्रक जाहीर करणे, अभ्यासक्रम निश्चित करणे, उमेदवारांकडून अर्ज मागविणे, अर्जांची छाननी करणे, प्रश्नपत्रिका व उत्तरपत्रिका यांची छपाई करणे, गुण देण्याची कार्यपध्दती, निकाल जाहीर करुन उमेदवारांना कळविणे इत्यादी परीक्षेच्या नियोजनासंदर्भातील सर्व बाबींची जबाबदारी "भाषा संचालक, भाषा संचालनालय" यांची राहील. सदर कर्तव्ये व जबाबदाऱ्या पार पाडण्यासाठी त्यांना अनुभवी तज्ज्ञ व्यक्ती, शिक्षक यांची मदत घेता येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०७२११३००१८९४३३ आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

HARSHWARDHAN TUKARAM JADHAV

Digitally signed by HARSHWARDHAN TUKARAM JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MARATHI LANGUAGE DEPARTMENT, 2.5.4.20=e2fe6cc4558c2e6d7354de29414546a527c688fec225545f57e427d7b0bbfc51, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9AE068EA61A07283211A87C7BC808B58EBCFF5FC50CC2738A19DFCBF7D81DFB8, cn=HARSHWARDHAN TUKARAM JADHAV
Date: 2023.07.21 13:02:44 +05'30'

**( हर्षवर्धन तु. जाधव )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
५) सचिव / विभागीय सचिव, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, वाशी
६) भाषा संचालक, भाषा संचालनालय, मुंबई
७) सहायक भाषा संचालक (प्रशिक्षण व आस्थापना), भाषा संचालनालय, मुंबई
७) सचिव, मराठी भाषा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
८) सर्व एतदर्थ मंडळांचे शासकीय व अशासकीय सदस्य (भाषा संचालनालयामार्फत)
९) निवड नस्ती/भाषा-२